**विकास परिषद २०१७-२०१८.**

मागणी क्रमांक एल-३, लेखाशीर्ष : २५१५, इतर ग्राम विकास कार्यक्रम, उप लेखाशीर्ष: १०१ (०१) (०४) गौणशीर्ष - विशेष कार्यक्रम व ग्राम अभियान कार्यक्रम यांच्या अंमलबजावणीमध्ये उत्कृष्ट काम केल्याबद्दल जिल्हा परिषद, पंचायत समित्या व ग्रामपंचायती यांना सप्रयोजन अनुदाने. (२५१५ ००६२)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विकास २०१७/ प्र.क्र.७८ /पं.रा.६**
**बांधकाम भवन इमारत, मर्झबान पथ,**
**२५ फोर्ट, मुंबई- ४०० ००१**
**दिनांक: ०४ सप्टेंबर, २०१७.**

**<u>प्रस्तावना :</u>**

ग्रामीण भागात विकास कार्यक्रमांची अंमलबजावणी करतांना जिल्हा परिषदांना येणा-या अडीअडचणींचा आढावा घेऊन जनतेला दर्जेदार सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी येणा-या अडचणींवर मात करण्यासाठी विभागामार्फत विकास परिषदेचे आयोजन करण्यात येऊन मा. मंत्री/ राज्यमंत्री, जिल्हा परिषद अध्यक्ष/ उपाध्यक्ष व विभागाशी संबंधित सर्व पदाधिकारी/ अधिकारी इत्यादींना आमंत्रित करण्यात येते.

**शासन निर्णय :**

यशवंत पंचायत राज अभियान व विकास परिषदेचे आयोजन या दोन कार्यक्रमांच्या अंमलबाजवणीसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षा करीता लेखाशीर्ष २५१५ ००६२ खाली एकूण रू.३,३०,००,०००/- (रूपये तीन कोटी तीस लक्ष फक्त) एवढी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली असून. यामध्ये विकास परिषदेसाठी रू.१५,००,०००/-एवढया निधीचा समावेश आहे.

सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात विकास परिषदेचे आयोजना करिता ‘लेखाशीर्ष २५१५००६२’ खाली रू.१०,००,०००/- (रूपये दहा लाख फक्त) एवढा निधी उपलब्ध आहे.

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात ग्रामीण भागात राबविण्यात येणा-या विकास कार्यक्रमांची अंमलबजावणी प्रभावीपणे व्हावी, या उद्देशाने दिनांक ०७ व ०८ सप्टेंबर, २०१७ रोजी पुणे येथे विकास परिषदेच्या आयोजनासाठी २५१५ ००६२ या लेखाशीर्षाखाली राखून ठेवण्यात आलेल्या रू.१०,००,०००/- (रूपये दहा लक्ष फक्त) एवढा निधी या शासन निर्णयान्वये उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांचे कोषागार संकेतांक (Treasury Code) क्रमांकावर अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीदवारे ( BDS) वितरीत करण्यात येत आहे.

३. सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात विकास परिषदेच्या आयोजनासाठी केलेला खर्च “मागणी क्र. एल-३,२५१५, इतर ग्राम विकास कार्यक्रम (०१) (०४) विशेष कार्यक्रम व ग्राम अभियान कार्यक्रम यांच्या अंमलबजावणीमध्ये उत्कृष्ट काम केल्याबददल जिल्हा परिषद पंचायत समिती व ग्रामपंचायती यांना प्रोत्साहनपर अनुदाने (२५१५ ००६२)३१ सहायक अनुदान” या लेखाशीर्ष खाली मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. या शासन निर्णयाव्दारे वितरीत करण्यात आलेले अनुदान हे, ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

५. सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षात विकास परिषद आयोजित करणेसाठी वितरीत केल्या जाणाऱ्या अनुदानापैकी कोषागारातून आहरित केलेल्या रकमेचे विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र महालेखाकार, मुंबई यांना ऑक्टोबर, २०१७ अखेर पर्यत पाठविणे आवश्यक राहील. सन २०१७-१८च्या उपयोगिता प्रमाणपत्रासंबंधी महालेखापाल कार्यालय मुंबई यांचेकडून उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांना प्राप्त झालेले Clearance Certificate नोव्हेंबर, २०१७ पर्यत शासनास पाठविण्याची जबाबदारी उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांची राहील.

६. शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक अर्थसं २०१७/ प्र.क्र.९४/ अर्थ ०३, दिनांक ३० जून, २०१७ मधील सुचनांनुसार, या शासन निर्णयाव्दारे अनुदान वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०४१२०४४३०८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anant Rajaram Athalye

Digitally signed by Anant Rajaram Athalye
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a0dd65a212d8e52c30447c65d3838be4355bafefbd3056543a1fd012578c2910, serialNumber=7adadd05a2db37cea922ca9026861a48418b7c472e86a4641b9b38be3b88ac28, cn=Anant Rajaram Athalye
Date: 2017.09.06 11:53:05 +05'30'

**(अनंत रा. आठल्ये)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) (जादा ५ प्रतीसह)
३) महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) (जादा ५ प्रतीसह)
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे
५) उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे.
६) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
७) जिल्हा लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, पुणे.
८) संचालक, लेखा कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) नियोजन विभाग, कार्यासन १४४३/१४४४, मंत्रालय, मुंबई
११) वित्त विभाग, मंत्रालय (व्यय-१५ /अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
१२) कार्यासन क्रमांक वित्त-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१३) निवड नस्ती, कार्यासन पं.रा. ०६, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.